**राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांच्याकडून महाराष्ट्र शासनामार्फत (Routed Through State Government) खेळत्या भागभांडवलासाठी सहकारी साखर कारखान्यांना मार्जिन मनी लोन उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ससाका- २०२३/प्र.क्र.२३/३स**
मंत्रालय विस्तार रूम नं. ६०२ , मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक , मुंबई-४०००३२
दिनांक : ०४ मे, २०२३

**वाचा :-** सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक ससाका२०१९/प्र.क्र.८०/३स, दि.०५.०९.२०१९.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) ही सहकारिता मंत्रालय, भारत सरकार यांच्या अंतर्गत एक वैधानिक संस्था आहे. सहकार क्षेत्राच्या विकासासाठी कार्यक्रम, निधी आणि योजना राबविल्या जातात. राष्ट्रीय सहकार विकास निगमच्या कार्यक्रमांमध्ये कृषी उत्पादने आणि काही अधिसूचित वस्तूंचे उत्पादन, प्रक्रिया आणि विपणन यासारख्या अनेक क्रियाकलापांचा समावेश आहे. राज्य सरकारांमार्फत पाठवलेल्या निधीव्यतिरिक्त, सहकारी संस्थांना त्यांच्या प्रकल्पांसाठी थेट निधीसाठी NCDC कडे जाण्याचा पर्याय आहे

राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांच्या मार्फत थेट कर्जपुरवठा करण्यासाठी दि.०३.०६.२००४ व दि.०४.०१.२०१६ रोजीच्या परिपत्रकान्वये सर्वसाधारण पात्रता निकष ठरविण्यात आलेले आहेत. राष्ट्रीय सहकार विकास निगम, नवी दिल्ली खालील निकषांच्या अधीन राहून थेट कर्ज पुरवठा करतात:

१. अर्थसहाय्याचे मागणी करणाऱ्या कारखान्याचे नक्त मुल्य अधिक (+) असावे तसेच सहकारी साखर कारखान्याचा भागभांडवलाचा ऱ्हास (Erosion) झालेला नसावा.

२. कर्ज स्वनीधीचे प्रमाण ६५:३५ ते ७०:३० या प्रमाणात असावे.

३. गतवर्षापर्यंतचे लेखापरिक्षण आर्थिक वर्ष संपताच सहा महिन्यात पूर्ण झालेले असावे.

४. संबंधित संचालकांनी राष्ट्रीय सहकार विकास निगम / बँक / वित्तीय संस्थांचे कर्ज चुकविलेले नसावे.

५. सिक्युरिटी मार्जिन १.२५ ते १.५ पट असावे

६. कारखान्याच्या साखरसाठा / इतर मालमत्ता तारण ठेवून घ्यावयाच्या वर्किंग कॅपिटल कर्जासाठी किमान २० % मार्जिन असावे.

७. कारखाना किमान तीन वर्ष चालू स्थितीत असावा.

८. आवश्यकता भासल्यास राष्ट्रीय सहकार विकास निगम कारखान्याच्या स्थावर मालमत्तेवर दुय्यम चार्ज निर्माण करील.

९. आवश्यकतेनुसार कारखान्याचे इस्क्रो अकाऊंट उघडून त्यात राष्ट्रीय सहकार विकास निगम च्या कर्जाचे हप्ते भरण्यात येईल.

मात्र जे कारखाने वरील निकषात बसत नाहीत त्यांना राष्ट्रीय सहकार विकास निगम थेट कर्जपुरवठा न करता राज्य शासनामार्फत प्रस्ताव आल्यास राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) मार्फत कर्ज पुरवठा करण्यात येतो.

राष्ट्रीय सहकार विकास निगममार्फत कर्ज उपलब्ध करुन देण्यासाठी यापूर्वीही राज्यशासनाने राष्ट्रीय सहकार विकास निगमकडे प्रस्ताव पाठविलेले आहेत. त्याद्वारे राष्ट्रीय सहकार विकास निगम कडून उपलब्ध करून देण्यात आलेल्या कर्जाची परतफेड/वसूली संबंधित सहकारी साखर कारखान्यांकडून होत नसल्याचे निदर्शनास आले आहे. राज्य शासनाकडून मात्र सदर कर्जाची नियमित परतफेड करावी लागते.

अशापरिस्थितीत यापुढे राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांच्यामार्फत राज्यशासनाकडून खेळत्या भागभांडवलासाठी सहकारी साखर कारखान्यांना मार्जिन मनी लोन उपलब्ध करून देण्यासाठी सुधारीत कार्यपध्दतीचा अवलंब करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. मा.मंत्री मंडळ बैठकीत राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांचेकडून महाराष्ट्र शासनामार्फत (Routed through State Government) खेळत्या भांडवलासाठी सहकारी साखर कारखान्यांना मार्जिन मनी लोन मंजूर करण्यासंदर्भात सहकार विभागाच्या मंत्रीमंडळ प्रस्तावावर मंत्रीमंडळाने दि.१९.०४.२०२३ च्या मंत्रीमंडळ बैठकीत सर्वकष विचार केला. चर्चेअंती याबाबत खालीलप्रमाणे धोरणात्मक निर्णय घेण्यात आला.

१) क. यापूर्वी ज्या सहकारी साखर कारखान्यांनी राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) कडून उभारणीसाठी कर्ज घेतले आहे व त्याची परतफेड केली नाही अशा कारखान्यांना खेळते भांडवली कर्जासाठी अपात्र ठरवावे.

ख. यापूर्वी ज्या सहकारी साखर कारखान्यांनी राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) मार्फत मार्जिन मनी / खेळते भांडवली कर्ज घेतले आहे व त्याची परतफेड केली नाही अशा कारखान्यांना सुध्दा अपात्र ठरविण्यात यावे.

ग. जे सहकारी साखर कारखाने राज्य शासनामार्फत किंवा बँकेमार्फत खाजगी कंपन्यांकडून भाडेतत्वावर चालविले जात आहेत अशा कारखान्यांना राज्य शासनामार्फत कर्ज उभारणी करण्यासाठी मान्यता देऊ नये.

घ. राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) ने थेट कर्जासाठी असमर्थता दर्शविल्यास अशा सहकारी साखर कारखान्यांचे प्रस्ताव राज्य शासनास प्राप्त होतात. या सर्व कारखान्यांना FACR (Fixed Asset Coverage Ratio) नुसार जी उपलब्ध कर्ज मर्यादा शिल्लक आहे त्या मर्यादेतच राज्य शासनाने राष्ट्रीय सहकार विकास निगमकडे शिफारस करावी व अशी शिफारस करतांना किमान रु. २५० प्रति क्विंटल (साखर विक्रीवर) टॅगींगद्वारे वसुली देणे सक्तीचे राहिल अशी अट टाकावी.

ङ. सदरील कर्ज व त्यावरील संपूर्ण व्याजाच्या परतफेडीकरीता संपूर्ण संचालक मंडळ वैयक्तीक आणि सामूहिकरित्या जबाबदार राहतील. याबाबत संबंधीत संचालकांनी कर्ज वितरणापूर्वी बंधपत्र सादर करणे आवश्यक राहील.

च. कर्जाची थकबाकी निर्माण झाल्यास एक महिन्याचे आत कारखान्याचे संचालक मंडळ बरखास्त करण्यात यावे व शासकीय प्रशासकीय मंडळ नियुक्त करण्यात यावे.

छ. कारखान्यावर साखर आयुक्तालयाने निर्माण केलेल्या कार्यकारी संचालकांच्या पॅनेलवरील कार्यकारी संचालक नेमणूक करणे बंधनकारक राहील.

ज. शासकीय येणेबाकीच्या परतफेडीसाठी रु. २५/- प्रति क्विंटल टॅगिंग करुन भरणा करणे बंधनकारक राहील.

२) राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांचेकडून महाराष्ट्र शासनामार्फत (Routed through State Government) खेळत्या भांडवलासाठी सहकारी साखर कारखान्यांना मार्जिन मनी

लोन मंजूर करण्यासाठी विचाराधीन सर्व प्रस्ताव तांत्रीक व वित्तीय तपासणीकरीता साखर आयुक्त यांच्याकडे परत पाठविण्यात यावे. त्यांच्याकडून प्राप्त पात्र प्रस्तावावर विचार करण्यासाठी मा.मंत्री (सहकार) यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रीमंडळ उपसमिती गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) मंत्रीमंडळ उपसमितीने शिफारस केलेल्या सर्व प्रस्तावांसाठी विभागाने आवश्यक अर्थसंकल्पीय तरतूद करुन घ्यावी. अर्थसंकल्पात केलेल्या तरतूदीच्या मर्यादेपर्यंतच मंजूरी देण्यात येईल.

२. शासन निर्णय क्र.ससाका२०१९/प्र.क्र.८०/३स दि.०५.०९.२०१९ अन्वये राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) कडून राज्य शासनामार्फत खेळत्या भागभांडवलासाठी मार्जिन मनी लोन उपलब्ध करुन द्यावयाचे झाल्यास आर्थिक व तांत्रिक छाननी करण्यासाठी समिती गठित करण्यात आलेली आहे. सदर समित्यांच्या शिफारशीनंतर याबाबतचा प्रस्ताव मंत्रीमंडळासमोर आणण्यासाठी त्यास मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांच्या अध्यक्षतेखाली मंत्री समितीच्या शिफारशीची आवश्यकता अनिवार्य होती. मात्र, आता मंत्रीमंडळातील निर्णयाप्रमाणे साखर आयुक्त, पुणे यांच्याकडून वरील अटी शर्तीची काटेकोरपणे तपासणी करुन तांत्रिक व वित्तीय तपासणी झाल्यानंतर पात्र प्रस्तावावर विचार करण्यासाठी मा.मंत्री (सहकार) यांच्या अध्यक्षतेखाली मंत्री मंडळ उपसमिती गठीत करण्यात आली असून सदर समितीची रचना खालीलप्रमाणे असेल:-

| | | |
|---|---|---|
| अ. | मा.मंत्री (सहकार) | - अध्यक्ष |
| ब. | मा.मंत्री (शालेय शिक्षण व मराठी भाषा) | - सदस्य |
| क. | मा.मंत्री (बंदरे आणि खनिकर्म) | - सदस्य |
| ड | मा.मंत्री (कामगार) | - सदस्य |
| इ. | अपर मुख्य सचिव (सहकार व पणन ) | - सदस्य |
| ई. | साखर आयुक्त, पुणे | - सदस्य सचिव |

३. मंत्रीमंडळ उपसमितीने मान्यता दिल्यानंतर राष्ट्रीय सहकार विकास निगम यांचेकडे पात्र सहकारी साखर कारखान्यांचे प्रस्ताव वित्त विभागाच्या सहमतीने पाठविण्यात येतील.

४. सदर शासन निर्णय मा.मंत्रीमंडळाच्या दि.१९.०४.२०२३ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३५४/२०२३/व्यय-२, दि.०२.०५.२०२३ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निणर्य महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आला असून त्याचा संकेतांक २०२३०५०४१४४१४४५४०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरी करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे रात्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINGADE ANKUSH PANDURANG

Digitally signed by SHINGADE ANKUSH PANDURANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, pseudonym=18BA78965A42BF3AA081DE760471DB6306C88F1D, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=SHINGADE ANKUSH PANDURANG
Date: 2023.05.04 15:05:40 +05'30'

**(अंकुश शिंगाडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतिः-**

१. मा.राज्यपाल महोदय यांचे खाजगी सचिव
२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.उपमुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा(शालेय शिक्षण व मराठी भाषा) मंत्री. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा (बंदरे आणि खनिकर्म) मंत्री.यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. मा(कामगार) मंत्री. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११.सर्व विधान परिषद सदस्य, विधान भवन, मुंबई
१२.सर्व विधान सभा सदस्य, विधान मंडळ, मुंबई
१३.साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४.सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
१५.महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१६.महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.
१७.वसंतदादा शुगर इंस्टिट्युट, पुणे.
१८. महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखानर संघ मर्या., मुंबई
१९. निवड नस्ती (३-स).